**शेतक-यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी विशेष मदतीचा कार्यक्रम राबविणेबाबत.**

निधी वापराबाबतच्या मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्र.एससीवाय-२०१५/प्र.क्र.११९ /म-७**

**मंत्रालय, मुंबई.**

**दिनांक:- २५ ऑगस्ट, २०१५**

वाचा:- १) शा.नि.,म.व व.विभाग, क्र.एससीवाय-२०१५/प्र.क्र.११९/म-७(भाग-२), दि.२४.०७.२०१५

**शासन परिपत्रक** :-

शेतक-यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी करावयाच्या उपाययोजनाच्या अनुषंगाने उपरोल्लिखित शासन निर्णयान्वये पथदर्शी प्रकल्प म्हणुन यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यांत जिल्हास्तरीय व ग्रामस्तरीय समिती गठित करण्यास मंजुरी देण्यात आलि आहे.सदर समितीस मंजुर करण्यात आलेल्या अनुक्रमे रु.१०.०० कोटी (Untied) व रु.१.०० लक्ष (वार्षिक) या निधीच्या वापराबाबतच्या मार्गदर्शक सूचना सोबत परिशिष्ट-"अ" व "ब" मध्ये देण्यात आल्या आहेत.

(अ) जिल्हास्तरीय समिती :- सदर समितीने त्यांना दिलेल्या निधीचा (Untied)वापर सदर पथदर्शी प्रकल्प पूर्ण होईपर्यंत करावयाचा आहे. सदर निधीचा वापर स्थानिक परिस्थिती व निकड विचारात घेऊन करण्यात यावा. सदर सूचना या मार्गदर्शक स्वरुपाच्या असल्याने त्यातील रकमेत विशेषत: पारितोषकांच्या रकमेत आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार समितीस राहतील.

(ब) ग्रामस्तरीय समिती :- सदर समितीने त्यांना दिलेल्या निधीचा वापर त्यांना दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार करावा. तथापि, जिल्हास्तरीय समितीच्या पुर्वमान्यतेने त्यात बदल करता येईल. तसेच खर्चाचा मासिक अहवाल जिल्हास्तरीय समितीस न चुकता सादर करावा.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०८२६१४५०३७१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANDAR MADHUKAR POHORE

Digitally signed by MANDAR MADHUKAR POHORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MANDAR MADHUKAR POHORE
Date: 2015.08.26 14:56:49 +05'30'

**( मंदार पोहोरे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती/औरंगाबाद

२) जिल्हाधिकारी, यवतमाळ/उस्मानाबाद.

**प्रत माहितीस्तव,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) निवडनस्ती (कार्यासन म-७)

## परिशिष्ट -"अ"

**जिल्हास्तरीय समितीस दिलेल्या रु.१०.०० कोटी ( Untied ) रकमेच्या खर्चाबाबतच्या मार्गदर्शक सूचना.**

| अ.क्र. | बाब | विषय | कमाल मर्यादा |
|---|---|---|---|
| १) | बळीराजा चेतना अभियानातील पाच घटकांसाठी | प्रथम:- रु.१,००,०००/-<br>द्वितीय:-रू.५०,०००/-<br>तृतीय:- रू.२५,०००/- | रु.१०.०० लक्ष |
| २) | शेतकरी आत्महत्या रोखण्यासंदर्भातील जिल्हास्तरीय पथनाट्य/कमी खर्चाची नाटके यांना बक्षीस | प्रथम:- रु. १,००,०००/-<br>द्वितीय:-रू.५०,०००/-<br>तृतीय:- रू.२५,०००/- | रु.२.०० लक्ष |
| ३) | उत्कृष्ट काम करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना (उदा.कृषि सहाय्यक) यांना बक्षीस देणे. | प्रथम:- रू.५०,०००/-<br>द्वितीय:-रू.२५,०००/-<br>तृतीय:- रू.१५,०००/- | रु.१.०० लक्ष |
| ४) | समस्यांच्या अनुषंगाने समस्यांचे निराकरण करणाऱ्या सामाजिक कार्यकर्ते, लोकसेवक, पंचायतराज संस्थांचे सदस्य (जि.प. / प.स./ग्रा.प.) यांना पारितोषीके देणे. | प्रथम:- रू.१,००,०००/-<br>द्वितीय:-रू.५०,०००/-<br>तृतीय:- रू.२५,०००/- | रु.२.०० लक्ष |
| ५) | **कृषि क्षेत्रातील नाविन्यपुर्ण कार्यासाठी पारितोषीके** :-<br>कमी पर्जन्यमानाच्या क्षेत्रामध्ये कमीत कमी खर्चामध्ये उत्तम दर्जाचे तंत्रज्ञान वापरून कृषि उत्पन्न वाढविणाऱ्या (५ एकर ) पेक्षा कमी क्षेत्र असलेल्या शेतकऱ्यांना पारितोषीक देणे. नैराश्यग्रस्त शेतकरी शोधुन काढणाऱ्यांना सामायीक बक्षीस देणे.<br>कमी खर्चाचे तंत्र व शेतकऱ्यांचे | पारितोषिकाची रक्कम जिल्हास्तरीय समितीने ठरविणे. | रु.१०.०० लक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| | जीवनमान उंचावणाऱ्या समुहांना परितोषीक देणे. उत्तम दर्जाचे शेतकरी निर्माण करणाऱ्यांना पारितोषीक देणे. | | |
| ६) | **सामुहीक विवाह :-** एका ठिकाणी कमीत कमी ५ सामुहीक विवाहावर खर्च करावा. शासन स्तरावरून सामुहीक विवाहासाठी सभागृह उपलब्ध करून द्यावे. तर प्रत्येक जोडप्यामागे रू.१५ हजार तर सभागृहात लग्न होणाऱ्या जोडप्यांसाठी रू.२० हजार एवढा खर्च जिल्हा प्रशासनाने करावा. जिल्हा प्रशासनाने अशा सामुहीक विवाहांसाठी संबंधित जाती, जाती मधील प्रतिष्ठीत व्यक्ती यांच्याशी संपर्क साधुन सामुहीक विवाहास चालना द्यावी. तसेच जोडप्यास रू.१५ हजार देण्यात यावे व एका मंडपात कमीत कमी १० विवाह सोहळे एका वेळेस आयोजित करावेत. सामुहीक विवाहास प्रोत्साहन देणाऱ्या प्रतिष्ठीत व्यक्तींना सुद्धा सदर कार्यक्रमात सामावुन घ्यावे. | स्थानिक परिस्थिती विचारात घेऊन प्रत्येक स्वतंत्र बाबी करिता बक्षिचाची/वाटपाची रक्कम कमाल मर्यादेच्या अधिन जिल्हास्तरीय समिती निश्चित करील. | रु.२०.०० लक्ष |
| ७) | **सकारात्मक विचारांचे कार्यक्रम :-** राज्यांतर्गत विपशनासाठी (निशुल्क कार्यक्रम) जाणाऱ्या शेतकरी कुटुंबातील व्यक्तींचा प्रवास खर्चाची प्रतिपुर्ती करणे. राज्यांतर्गत आर्ट ऑफ लिव्हींगच्या (कार्यक्रमांचा खर्च संबंधितांनी करावा)कार्यक्रमांसाठी जाणाऱ्या शेतकरी कुटुंबातील व्यक्तींच्या प्रवास खर्चाची प्रतिपुर्ती | | रु.१०.०० लक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| | करणे. प्रत्येक ग्राम पंचायतीतुन कमीत कमी ५ व्यक्तीपर्यंतचा खर्च करावा. | | |
| ८) | **सामाजिक संघटनांना विशेष कार्यक्रम आयोजित करण्यासाठी मासिक रू.२५ हजार पर्यंतचे घरभाडे / कार्यालयीन भाडे यांची प्रतिपुर्ती करणे.**<br>आर्ट ऑफ लिव्हींग / भजन / ध्यान धारणा कार्यक्रम आयोजित करणाऱ्या सामाजिक संघटनांना वरील प्रमाणे घरभाडे/ कार्यालयीन भाडे अनुज्ञेय ठरवावे. संघटनांनी तालुका स्तरावर काम करावे. अशासकीय सामाजिक संस्थांना सुद्धा वरील कार्यक्रमांत सहभागी करावे. वरील कामकाजाचे मुख्यालय जिल्हा स्तरावर न ठेवता तालुका स्तरावर ठेवण्यात यावे. | | रु.१०.०० लक्ष |
| ९) | **पारंपारीक भजन मंडळ आणि किर्तनकार यांना विशेष सवलती देणे.**<br>एका तालुक्यासाठी शक्यतो संध्याकाळी काम करण्यास इच्छुक असणाऱ्या एका किर्तनकारास मासिक मानधन एक वर्षासाठी देण्यात यावे.<br>एका तालुक्यासाठी संगीत शिक्षक / गायक काम करण्यास इच्छुक असल्यास मासिक मानधन एका वर्षासाठी देण्यात यावे.<br>भजनी मंडळ / संगित संसाधने यांना प्रोत्साहन द्यावे. | | रु.१०.०० लक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| | **शेतकऱ्यांना स्वत:हुन प्रशिक्षण देणाऱ्या कृषि तज्ज्ञांना मानधन देणे.** शेतकऱ्यांना प्रशिक्षण देणाऱ्या कृषि तज्ज्ञ / पशुवैद्यकीय तज्ज्ञ यांना मानधन देणे. वरील वेतन / मानधनाची प्रतिपुर्ती करणे. स्थानिक लोकांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षण खर्चाची प्रतिपुर्ती करणे. सदरची प्रतिपुर्ती प्रकरणनिहाय करणे. | | रु.२०.०० लक्ष |
| १०) | **प्रतिष्ठीत संघटना / खाजगी व्यक्ती यांच्याशी भागीदारी.** आधुनिक शेती तंत्र शेतकऱ्यांना विनामुल्य देणाऱ्या प्रतिष्ठीत शैक्षणीक संस्था / संशोधन संस्था / सामाजिक संस्था (TISS, M.S.Swaminathan Foundation, ICRISAT)यांच्याशी भागीदारी करणे संबंधित संस्थांच्या तज्ज्ञांचा प्रवास खर्च व इतर खर्चाची प्रतिपुर्ती करणे.<br>शेती तंत्राबाबत निशुल्क सेवा देणाऱ्या सेवानिवृत्त कृषि तज्ज्ञांचा प्रवास, राहण्याचा व इतर खर्च एक वर्षाच्या मर्यादेत करणे. | | रु.२०.०० लक्ष |
| ११) | **जिल्हा स्तरावर कक्ष चालविण्यासाठी** आस्थापना/कार्यालयीन खर्च. | | रु.२५.०० लक्ष |

*****

## परिशिष्ट -"ब"

**ग्रामस्तरीय समितीस दिलेल्या वार्षिक रु.१.०० लक्ष रकमेच्या खर्चाबाबतच्या मार्गदर्शक सूचना.**

| अ.क्र. | बाब | खर्चाची कमाल वार्षिक मर्यादा |
|---|---|---|
| १ | गावात मोफत वाचनालय सुरु करुन त्यात प्रमुख वृत्तपत्रे, शेती विषयक मासिके उपलब्ध करुन देणे. | रु.५,०००/-<br>(रुपये पाच हजार फक्त) |
| २ | गावातील त्रस्त कुटुंबियांच्या सर्वेक्षणाच्या कामाकरिता तसेच ग्राम समितीच्या कामाकरिता लेखन सामग्री, प्रवास खर्च इत्यादी प्रशासनीक बाबीसाठी खर्च. | रु.५,०००/-<br>(रुपये पाच हजार फक्त) |
| ३ | सार्वजनिक उत्सव साजरे करण्यासाठी खर्च. | रु.१०,०००/-<br>(रुपये दहा हजार फक्त) |
| ४ | ग्रामसभेने बहुसंख्येने मंजुरी दिलेल्या त्रस्त कुटुंबास पेरणी/बियाणे करिता | एका प्रकरणी रु.५,०००/- च्या कमाल मर्यादेत एकुण खर्च रु.३०,०००/- |
| ५ | एखाद्या गरीब कुटुंबियावरील अकस्मात खर्चासाठी (आजरपण,अपघात इ.) | एका प्रकरणी रु.५,०००/- च्या कमाल मर्यादेत एकुण खर्च रु.३०,०००/- |
| ६ | २-३ महिन्यांकरिता बिनव्याजी कर्ज (हात उसनवारी) देणे. | एका प्रकरणी रु.५,०००/- च्या कमाल मर्यादेत एकुण खर्च रु.२०,०००/- |

*****